राज्य सार्वजनिक उपक्रमांचे / महामंडळाचे / आयोगांचे वार्षिक प्रशासन व लेखा अहवाल विधानमंडळास छापील प्रतीत व सी. डी. स्वरुपात सादर करण्याची सुधारीत कार्यपध्दती..

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शासाउ-१०.१५/प्र.क्र.४८/सा.उ.**
**मादाम काम रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
तारीख: २०/१०/२०१५

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.शासाउ-१०१२/प्र.क्र.२४/सा.उ., दि.३०/७/२०१२.
२) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई यांचे क्रमांक ४६०३/म.वि.स./अ, दि.१/२/२०१३ चे पत्र.
३) वित्त विभाग क्रमांक शासाउ-१०.१२/प्र.क्र.२४/सा.उ., दिनांक ६/३/२०१३ चे पत्र.
४) उपसचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई यांचे क्रमांक ३७०३०/म.वि.स./ई-२, दि.२१/८/२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्य सार्वजनिक उपक्रम कंपनी अधिनियम, १९५६ व सांविधिक अधिनियमाव्दारे स्थापन करण्यांत आलेले आहेत. संबंधित अधिनियमाच्या तरतुदींनुसार या उपक्रमांचे लेखे विहित कालावधीत अंतिम करुन ते राज्य विधान मंडळाला सादर करणे बंधनकारक आहे. राज्य सार्वजनिक उपक्रमांचे / महामंडळाचे / आयोगांचे वार्षिक प्रशासन व लेखा अहवाल विधानमंडळास छापील प्रतीत व सी. डी. स्वरुपात विधानमंडळाला सादर करण्याबाबत संदर्भाधिन क्रमांक १ येथील दिनांक ३०/७/२०१२ च्या शासन निर्णयान्वये व दिनांक ६/३/२०१३ च्या पत्रान्वये सूचना देण्यांत आल्या आहेत. आता महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील दिनांक २१/८/२०१५ च्या पत्रान्वये विधानमंडळाचे कामकाज कागद विरहित (Paperless) करण्याच्या दृष्टीने सुधारित कार्यपध्दतीचा अवलंब करण्याचे निदेश दिले आहेत. सदर पत्रान्वये दिलेल्या निदेशानुसार या संदर्भातील सुधारित कार्यपध्दती कार्यान्वयीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन संदर्भाधीन क्रमांक १ व ३ येथील शासन निर्णय व पत्रान्वये दिलेल्या सूचना अधिक्रमित करण्यात येत असुन, या सदंर्भात महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये दिलेल्या निदेशानुसार यापुढे राज्य सार्वजनिक उपक्रमांचे / महामंडळांचे / आयोगाचे वार्षिक व लेखा अहवाल विधानमंडळास सादर करण्यासंदर्भात खालीलप्रमाणे सुधारित कार्यपध्दती लागू करण्यांत येत आहे :-

१) राज्य सार्वजनिक उपक्रमांचे / महामंडळाचे वार्षिक प्रशासन व लेखा अहवाल विधानमंडळाच्या सन्माननीय सदस्यांना इंटरनेटच्या माध्यमातून उपलब्ध व्हावा याकरीता सदर अहवाल विधानमंडळ सचिवालयाच्या www.mls.org.in या संकेत स्थळावर (Upload) उपलब्ध करण्यात यावा.

२) **राज्य सार्वजनिक** उपक्रमांचे /महामंडळाचे/**आयोगांचे** वार्षिक प्रशासन व लेखा अहवाल यांच्या सॉफ्ट कॉपीज Adobe Reader (PDF File) स्कॅनिंग न करता, Pdf File मध्ये शक्यतो २० MB किंवा त्यापेक्षा कमी साईजमध्ये तसेच पुस्तक स्वरुपात प्रत्येकी २५ छापील प्रती (Hard Copy) व २० सी.डी. (मराठी/इंग्रजी) मध्ये विधानमंडळ सचिवालयास उपलब्ध करुन देण्यात याव्यात.

२. राज्य सार्वजनिक उपक्रमांचे / महामंडळाचे / आयोगांचे वार्षिक प्रशासन व लेखा अहवाल महामंडळात सादर करण्याबाबत या शासन निर्णयाप्रमाणे उपक्रमांकडून कार्यवाही करुन घेण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२०१०३१०८५९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nandkumar Vinayak Patil

Digitally signed by Nandkumar Vinayak Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce9cafdb2d77228866b253453609d4172186ef633a0e6652be9122d2ff0f02b4, serialNumber=902abe41cad66d00f934742a06d8ef2ed271058f89b916c049998c81b874e0a2, cn=Nandkumar Vinayak Patil
Date: 2015.10.20 12:13:06 +05'30'

**( नं. वि. पाटील )**
अवर सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३. मा. मुख्य सचिव यांचे सहसचिव,
४. सर्व विधानमंडळ सदस्य,
५. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. सर्व सार्वजनिक उपक्रमाचे व्यवस्थापकीय संचालक / मुख्य कार्यकारी अधिकारी,
७. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सचिव (ले. व को.) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.सचिव (वि. सु.) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.महालेखापाल (लेखा व लेखापरीक्षा) (वाणिज्यिक), मुंबई १/नागपूर २,
१२.विभागातील सर्व सहसचिव / उप सचिव,
१३.निवडनस्ती (सा.उ.)